कार्यकारी अभियंता (स्थापत्य)
यांच्या बदल्या/नियुक्त्या

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक : टीएफएस-१११४/प्र.क्र.१००/सेवा-१,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : २ सप्टेंबर, २०१४

**संदर्भ :** शासन निर्णय क्रमांक - इएसटी २०१४/प्र.क्र.२९/प्रशासन १, दिनांक ३०.०८.२०१४

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्रधिकाऱ्याच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ श्री. शा.सु.गांगुर्डे, कार्यकारी अभियंता, पूल, (मानक) इमारती संकल्पचित्र मंडळ, नवी मुंबई यांची बदली संदर्भिय दिनांक ३०.०८.२०१४ च्या शासन आदेशान्वये मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडील सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग करण्यात आलेल्या कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विशेष प्रकल्प विभाग, चेंबूर, मुंबई (पूर्वीचा ठाणे खाडी पूल विभाग क्र. २, चेंबूर, मुंबई) या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सा.बां.) विभाग, नवी मुंबई यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. गांगुर्डे यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून, आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणुकीच्या जागी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे. बदली झालेल्या अधिकाऱ्यांस रजा मंजूर करु नये.

३. बदली झालेल्या श्री. गांगुर्डे यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जावू नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. श्री. गांगुर्डे, कार्यकारी अभियंता यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, सार्वजनिक बांधकाम विभाग, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०३१११५०७७५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sampat Dasharath Suryavanshi

Digitally signed by Sampat Dasharath Suryavanshi
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sampat Dasharath Suryavanshi
Date: 2014.09.03 11:11:39 +05'30'

(सं. द. सुर्यवंशी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/अमरावती/ नागपूर/ विशेष प्रकल्प, मुंबई/राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
३. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
४. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई,
५. सह सचिव (सं.नि.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. मा. मंत्री (सा.बां., सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा. मंत्री सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
८. मा. राज्यमंत्री (सा. बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
१०. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
११. संचालक, उपवने व उद्याने,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. महालेखापाल-१ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, मुंबई,
१३. महालेखापाल-२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, नागपूर,

१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / निवासी लेखाधिकारी, मुंबई,

१५. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

१६. श्री. शा.सु.गांगुर्डे, कार्यकारी अभियंता, पूल, (मानक) इमारती संकल्पचित्र मंडळ, नवी मुंबई

१७. मा. सचिव (बांधकामे ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,

१८. मा. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,

१९. सर्व अधिकारी / कार्यासने, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

२०. कार्यासन आस्था-१/आस्था-३/सेवा-६/प्रशा-१ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

२१. कार्यासन संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

२२. कार्यासन - सेवा-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
(निवड नस्तीसाठी)